राज्यशासनामार्फत बाजार हस्तक्षेप योजनेंतर्गत खरेदी करण्यात आलेल्या तुरीची भरडाई केल्यानंतर,तुरडाळीची विक्रीबाबत सुचना.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक: सपस-२०१७/प्र.क्र.१९८/(भाग-३)/२४- स**
मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२
**दिनांक:- १९ जून, २०१८**

**संदर्भ** :-(१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग,क्रमांक:-सपस-२०१७/ प्र.क्र.७७/२४-स, दिनांक २७.०४.२०१७, १६.०५.२०१७ व २६.०५.२०१७.
(२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग,क्रमांक:-सपस-२०१७/ प्र.क्र.१९८/२४-स,दि. २५.१०.२०१७ व दि.२८.११.२०१७.
(३) मा.मंत्रीमंडळाची दिनांक २९/५/२०१८ रोजीच्या बैठकीतील निर्णय.

**प्रस्तावना :-**

राज्यात हंगाम २०१६-१७ मध्ये तूरीचे मोठ्या प्रमाणात झालेले उत्पादन परिणामी तुरीची बाजारातील आवक वाढून, तुरीसाठी निश्चित केलेल्या किमान आधारभुत किंमतीपेक्षा, कमी बाजारभाव शेतकऱ्यांना मिळत असल्याने, केंद्र व राज्य शासनामार्फत वेगवेगळया योजनांतर्गत तुरीची हमी भावाने खरेदी करण्यात आली आहे.

राज्यशासनाने स्वत:च्या निधीतून बाजार हस्तक्षेप योजनेंतर्गत २५.२५ लाख क्विंटल तुर खरेदी केली आहे. या तुरीची भरडाई करुन, तुरडाळ स्वस्त धान्य दुकाने व शासकीय विभागांना विक्री करण्याचा निर्णय संदभाधिन क्र.२येथील शासन निर्णयानुसार घेण्यात आला आहे. या तुरडाळीच्या विक्री जलद गतीने व्हावी यासाठी काही सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या संदर्भात मंत्रिमंडळातील बैठकीतील चर्चा व मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली संबंधित विभागाचे सचिव यांच्याबरोबर झालेल्या आढावा बैठकीतील निर्णयानुसार तुर डाळीची विक्री करण्यास खालीलप्रमाणे सुचना देण्यात येत आहेत.

२. राज्य शासनाचे सर्व विभागांची शासकीय कार्यालये, अंगणवाडी केंद्र, शाळा, आश्रम शाळा, वस्तीगृहे, वैदयकीय रुग्णालये, सर्व प्रकारची आरोग्य केंद्रे, शासकीय अनुदानित सर्व संस्था, नागरी आणि ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्था, सार्वजनिक उपक्रम व कारागृह यासारख्या ठिकाणी (ज्यांचा यापुढे **शासकीय व निम्न-शासकीय कार्यालये** असा उल्लेख आहे) कोणत्याही

प्रकारच्या आहार/अल्पोहार/भोजन याकरिता, धान्य/शिधा, निविदा मागवून कंत्राट धारकांमार्फत पुरविला जातो. अशा सर्व कार्यालयांनी तुर डाळ पुरवठा करण्याबाबतची नवीन निविदा राज्य शासनाने खरेदी केलेल्या संपूर्ण तुरीची, तुरडाळ विक्री होईपर्यंत प्रसिध्द करु नये.

३. ज्या शासकीय व निम्न-शासकीय कार्यालये यांच्या तुर डाळ पुरवठा करण्याची निविदा सदरचा शासन निर्णय निर्गमीत करण्यापूर्वी मंजूर झाली आहे, व मान्य कंत्राटदाराचा तुरडाळीचा दर रुपये ५५/- प्रती किलापेक्षा जास्त आहे, अशा कंत्राटदारासोबतच्या करारात Fore closure ची तरतुद असेल, अशा कार्यालयानी Fore closure च्याआधारे या तुरडाळीचा पुरवठा करण्याचे कंत्राट रदद करुन, तुर डाळीची मागणी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या, मुंबई यांचेकडे तात्काळ नोंदवावी.

४. ज्या शासकीय व निम्न-शासकीय कार्यालये यांची तुर डाळ पुरवठा करण्याची निविदा मंजूर झाली आहे, व मान्य कंत्राटदाराचा तुरडाळीचा दर रुपये ५५/-प्रती किलापेक्षा जास्त आहे, परंतु, कंत्राटदाराचा करारात Fore closure नाही तसेच कंत्राटदारासोबतच्या अटी व शर्ती स्पष्ट नसल्यामुळे, कंत्राट रदद करणे शक्य नसेल तर,अशा प्रकरणी संबंधित कार्यालयांनी यासंदर्भात कायदेशीर सल्ला घेऊन, पुढील कार्यवाही जिल्हा स्तरावरील यासंदर्भात गठित करण्यात आलेल्या समन्वय समितीमध्ये योग्य तो निर्णय घेऊन करावी.

५. ज्या शासकीय कार्यालये व निम्न-शासकीय कार्यालये यांच्या तुर डाळ पुरवठा करण्याची निविदा मंजूर झाली आहे, व मान्य कंत्राटदाराचा तुरडाळीचा दर रुपये ५५/-प्रती किलापेक्षा कमी आहे, अशा प्रकरणी मान्य निविदेतील दरानुसार तुरडाळीचा पुरवठा कंत्राटदारामार्फत चालु ठेवण्यास हरकत नाही.

६. वरील परि.२ मध्ये नमुद केलेल्या सर्व कार्यालयांनी आपल्याकडील साठवणुकीची सुरक्षित जागा विचारात घेऊन, त्यांना किमान पुढील ०२ ते ०३ महिन्याच्या कालावधीसाठी लागणा-या तुर डाळीची मागणी किमान १५ दिवस अगोदर, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या, मुंबई (e-mail- gmmktg@mahamarkfed.org Phone No ०२२-२३७५२२९४ ते ९८) किंवा जिल्हयाचे जिल्हा पणन अधिकारी यांचेकडे नोंदवावी. सदरचा पुरवठा खालील अटी व शर्ती नुसार करण्यात यावा.

(अ) वरील सर्व कार्यालयाची तुरडाळीची मागणी प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून, १५ दिवसांत मागणी प्रमाणे तुरडाळीचा रुपये ५५/- प्रती किलो या दराने वाहतूक खर्चासह पुरवठा करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या,मुंबई यांची राहील.

(ब) या निर्णयाची अंमलबजावणीची जिल्हास्तरावर समन्वय करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

(१) संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी ----- अध्यक्ष

(२) संबंधित जिल्हयाचे मुख्यकार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ----- सदस्य

(३) संबंधित जिल्हयाचे जिल्हा पुरवठा अधिकारी, ----- सदस्य

(४) संबंधित जिल्हयाचे जिल्हा पणन अधिकारी, पणन महासंघ ----- सदस्य सचिव.

(क) कंत्राटदाराने/संबंधित शासकीय व निम्न- शासकीय कार्यालये यांनी लागणा-या तुर डाळीची मागणी आपल्या जिल्हयाच्या अधिका-यामार्फत, जिल्हयाच्या जिल्हा पणन अधिकारी यांचेकडे नियमीतपणे नोंदवावी. कंत्राटदाराने मागणी केल्याप्रमाणे तुरडाळीचा पुरवठा करण्याची जबाबदारी तसेच पुरवठा केलेल्या तुर डाळीचे देयक वरील (अ) प्रमाणे तयार करुन रक्कम वसुल करुन, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या, मुंबई यांच्या सुचनेप्रमाणे जमा करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा पणन अधिकारी यांची राहील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१९१५३४४४६८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Valvi Kalu Gonya

Digitally signed by Valvi Kalu Gonya
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Op,Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, cn=Valvi Kalu Gonya
Date: 2018.06.19 15:35:05 +05'30'

**( का.गो.वळवी )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण) मंत्रालय, मुंबई

५) मा. सर्व मंत्री व राज्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६) मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे मंत्रालय, मुंबई
७) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
८) मा.अपर मुख्य सचिव ( वित्त ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) सर्व विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव / सचिव,
१०) प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई,
१२) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ.पुणे
१३) सर्व जिल्हाधिकरी,
१४) सर्व मुख्यकार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
१५) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
१६) सर्व जिल्हा मार्केटिंग अधिकारी, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.
१७) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१८) महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
१९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२०) वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२
२१) अवर सचिव, १७ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२) निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.